**जिल्हा विभाजनानंतर मूळ जिल्हयाचा विकल्प दिलेल्या कर्मचा-यांची सेवाज्येष्ठता ठरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.एपिटी २०१० /प्र.क्र. १३१/आस्था ८
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ मे, २०१०.

**प्रस्तावना :**

शासनाने भंडारा, धुळे, उस्मानाबाद, परभणी व अकोला या जिल्हयाचे प्रशासकीय कामाच्या सोयीकरीता विभाजन करुन गोंदिया, नंदुरबार, लातूर, हिंगोली व वाशिम असे नवीन जिल्हे निर्माण केले. त्यावेळी नवनिर्मित जिल्हयासाठी कर्मचारी वर्गाची नियुक्ती करण्याकरीता पूर्वीच्या जिल्हयातील कर्मचा-यांकडून विकल्प मागविण्यात आले. सदर प्रसंगी मूळ जिल्हयाचा विकल्प दिलेल्या कर्मचा-यांनासुध्दा प्रशासकीय सोयीसाठी नवनिर्मित जिल्हयात नियुक्त्या दिल्या गेल्या. तद्नंतर अशा कर्मचा-यांना त्यांच्या विनंतीनुसार मूळ जिल्हयातील रिक्त पदांवर सामावून घेतल्यानंतर त्यांना आंतरजिल्हा बदलीचे निकष लावण्यात येतात, म्हणजेच त्यांना शून्य ज्येष्ठतेवर सामावून घेण्यात आले. अशा कर्मचा-यांनी जिल्हा विभाजनाच्यावेळी मूळ जिल्हयाचा विकल्प दिलेला असून प्रशासकीय सोयीकरीता त्यांना नवनिर्मित जिल्हयामध्ये नियुक्ती दिलेली असल्यामुळे पुन्हा मूळ जिल्हयात समायोजन करताना त्यांची सेवाज्येष्ठता त्यांच्या मूळ विकल्पाप्रमाणे धरण्यात यावी, याबाबत कर्मचा-यांनी शासनाकडे विनंती केली होती.

त्या विनंतीच्या अनुषंगाने या विभागाच्या क्र.एपिटी-४००५/ प्र.क्र.३१५/ आस्था-७ दिनांक ७/२/२००६ च्या पत्रान्वये जिल्हा परिषद भंडारा जिल्हयातील कर्मचा-यांबाबत जिल्हा विभाजनाच्या वेळेस विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी महसूल विभागाच्या कर्मचा-यांच्या संदर्भात जो निर्णय घेतला असेल तोच निर्णय तत्वत: लागू करण्यात यावा व त्यानुसार भंडारा-गोंदिया या जिल्हयांमधील जिल्हा परिषद कर्मचा-यांविषयी विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांच्या मान्यतेने आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला. तसेच धुळे-नंदूरबार जिल्हयातील कर्मचा-यांच्याबाबतीत या विभागाच्या

पत्र.क्र.एपिटी-२००७/ प्र.क्र.१७७/ आस्था-८ दिनांक ९/८/२००७ अन्वये ज्या कर्मचा-यांनी त्यांच्या मूळ जिल्हा परिषदेचा विकल्प दिला असेल अशा कर्मचा-यांचे जिल्हा विभाजनापासून १० वर्षे पर्यंत त्यांच्या विनंतीनुसार रिक्त असलेल्या पदावर त्यांच्या मूळ जिल्हयात समायोजन करताना / आंतरजिल्हा बदलीने पदस्थापना केलेली असली तरी त्यांची सेवाज्येष्ठता त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून धरण्यात यावी, असा निर्णय घेण्यात आला. असाच निर्णय परभणी-हिंगोली येथील कर्मचा-यांच्याबाबतीत घेण्यात आला आहे. तसेच अकोला जिल्हयातून वाशिम हा नवीन जिल्हा निर्माण करण्यात आला. उपरोक्त प्रमाणे ज्या कर्मचा-यांनी मूळ जिल्हयासाठी विकल्प दिला होता परंतु प्रशासकीय कारणास्तव त्यांचे नवनिर्मित जिल्हयात समायोजन करण्यात आले होते अशा कर्मचा-यांनी आता आंतरजिल्हा बदलीने मूळ जिल्हयात बदली होताना त्यांची सेवाज्येष्ठता मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून धरण्यात यावी अशी विनंती महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ यांनी शासनाला केली आहे. प्रस्तुत प्रकरणी सर्वकष विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

प्रशासकीय कामाच्या दृष्टीने जिल्हयाचे विभाजन करुन नवनिर्मित जिल्हयांची निर्मिती करण्यात आली. त्यावेळी नवनिर्मित जिल्हयासाठी कर्मचारी वर्गाची नियुक्ती करण्याकरीता पूर्वीच्या जिल्हयातील कर्मचा-यांकडून विकल्प मागविण्यात आले. सदर प्रसंगी मूळ जिल्हयाचा विकल्प दिलेल्या कर्मचा-यांनासुध्दा प्रशासकीय सोयीसाठी नवनिर्मित जिल्हयात नियुक्त्या दिल्या गेल्या. तद्नंतर अशा कर्मचा-यांना त्यांच्या विकल्पानुसार मूळ जिल्हयातील रिक्त पदांवर सामावून घेण्यात आले. सदर जिल्हा विभाजनाच्या वेळेस विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी महसूल विभागाच्या कर्मचा-यांनी दिलेल्या विकल्पानुसार ज्येष्ठता अबाधित ठेऊन कार्यवाही करण्याचा निर्णय घेतला. तो समानतेच्या दृष्टीकोनातून तत्वत: लागू करण्यात येत आहे. अशा प्रकरणी विहित केलेली १० वर्षाची कमाल अट लागू करु नये. याबाबत विभागीय आयुक्त यांनी प्रकरण परत्वे त्यांच्या स्तरावरुन आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय संगणक संकेतांक क्रमांक २०१००५२६१८२११६००१ अन्वये www.maharashtra.gov.in या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन आस्था-४, आस्था-५, आस्था-७, आस्था ९, आस्था १०, आस्था-११, आस्था-१२ व आस्था-१४
४) निवड नस्ती / आस्था-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.